तेन तत्र न प्रसक्तः प्रत्ययस्वर कदाचित् ॥

प्रत्ययस्वरश्च तासेर्वृत्तिसंनियोगशिष्टः। तेन चाप्यसावुदात्तो लोप्स्यते तथा न दोष ॥

कदाचित्प्रत्ययस्वरो भवत्यपवादं लसार्वधातुकानुदात्तत्व प्रतीक्षते। तत्रानुदात्तत्व क्रियता लोप इति यद्यपि परत्वाल्लोप सोऽसावविद्यमानोदात्तत्वेऽनुदात्त उदात्तो लुप्यते ॥

प्रत्ययस्वरापवादो लसार्वधातुकानुदात्तत्वम्।

इति श्रीभगवत्पतञ्जलिविरचिते व्याकरणमहाभाष्ये द्वितीयस्याध्यायस्य चतुर्थे पादे द्वितीयमाह्निकम् ॥ पादश्च समाप्तः ॥

---

दात्तस्वर त्याची वाट पाहत बसेल तेव्हा. अध्येता येथे तप्रत्ययाचे ठिकाणीं केलेला डा आदेश उदात्तस्वराचा म्हणता येत नाही तेव्हा कृ तास्-आ असे असता लसार्वधातुकानुदात्तस्वर करावा किंवा टिलोप करावा असा विचार उपस्थित झाला असता जरी पर असल्यामुळे टिलोप झाला तरी त्यानंतर उदात्तनिवृत्तिस्वर प्रवृत्त होतो. जरी त हा प्रत्यय पित् नसल्यामुळे अनुदात्तस्वराचा नाही व त्यामुळे अनुदात्त पुढे नसल्यामुळे उदात्तनिवृत्तिस्वर येणार नाही तरी वर सांगितल्याप्रमाणे प्रत्ययस्वर उदात्त न झाल्यामुळे 'ज्यामध्यें उदात्त नाहीं' अशा अर्थानें त हा अनुदात्त पुढें आहे, म्हणून उदात्तनिवृत्तिस्वर प्रवृत्त होतो

लसार्वधातुकानुदात्तस्वर प्रत्ययस्वराचा अपवाद असल्यामुळे अध्येता येथे तप्रत्ययाला प्रत्ययस्वर केव्हाही येऊ शकत नाहीं, आणि तास्प्रत्ययाविषयी अपवाद नसल्यामुळे प्रत्ययस्वर तास्प्रत्ययाच्या प्रवृत्तीबरोबरच प्रवृत्त होतो, त्यामुळे डकारेत्संज्ञक आप्रत्ययाच्या निमित्ताने झालेला तास्प्रत्ययातील टिलोप हा ज्यात उदात्त नाही असा अनुदात्त पुढे असताना उदात्तलोप झाला असल्यामुळे उदात्तनिवृत्तिस्वर प्रवृत्त होतो, म्हणून दोष येत नाहीं

याप्रमाणे भगवान्पतंजलिऋषींनीं रचिलेल्या व्याकरणमहाभाष्यातील दुसऱ्या अध्यायाच्या चौथ्या पादातील दुसरें आह्निक समाप्त झालें व पाद आणि अध्याय हेही समाप्त झाले

---

१० 'अनुदात्तस्य च०' या सूत्रातील अनुदात्तपदानें पारिभाषिक अनुदात्त घ्यावयाचा नाहीं, तर अविद्यमानं उदात्त यत्र सोऽनुदात्त, असा यौगिक अनुदात्त घ्यावयाचा